**राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणासाठी एम.टी.एन.एल. कुपरेज एक्सेंज इमारत, मुंबई येथे भाडयाने घेतलेल्या जागेच्या कराराचे नुतनीकरणास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रापोतप्रा-०४२२/प्र.क्र.६६/पोल-१४**
दुसरा मजला, मुख्य इमारत, मंत्रालय
मुंबई-४०० ०३२
दि.१९.०४.२०२४.

वाचा:-(१) राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण यांचे पत्र क्र.रापोतप्रा/लेखा/प्र.क्र.९१/२०१९ /९५४, दि ०५.०९.२०२३ चे पत्र व त्यासोबतचे महानगर टेलीफोन निगम यांचा प्रारुप करारनामा

(२) शासन निर्णय,गृह विभाग क्र.गृहआ-२०१५/प्रक्र.४४७/आस्था-२, दि.१८.०१.२०१६

**प्रस्तावना:-**

गृह विभागामार्फत महाराष्ट्र पोलीस (सुधारणा व पुढे चालु ठेवणे),अधिनियम २०१४ अन्वये राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणाचे गठन करण्यात आले आहे. राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण तातडीने सुरु करण्यासाठी एमटीएनएल इमारत, कुपरेज फुटबॉल मैदानासमोर, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई येथील चौथ्या मजल्यावरील ५९८० चौ.फु. जागा भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास, शासन निर्णय, गृह विभाग क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र .४४७ /आस्था २, दि. १८.०१.२०१६ अन्वये मान्यता देण्यात आली होती.

**शासन निर्णय-**

राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण कार्यालयाने उपरोक्त जागा भाड्याने घेण्याच्या अनुषंगाने एम.टी.एन.एल सोबत केलेला करारनामा दि. २८ ऑक्टोबर,२०१९ पासून पुढील तीन वर्षांसाठी दि. २७ ऑक्टोबर, २०२२ रोजी संपुष्टात आला असल्याने आता दि. २८ ऑक्टोबर, २०२२ ते ३१ ऑक्टोबर,२०२४ इतक्या कालावधीसाठी एम.टी.एन.एल सोबत करारनामा नुतनीकरण करण्यास याद्वारे, शासन मान्यता देत आहे.

२. तसेच एमटीएनएल यांच्याशी शासनाच्या वतीने करार करण्यास अपर पोलीस महासंचालक (आस्थापना ) तथा सदस्य सचिव, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.तसेच त्यांनी सदर करारनामा तपासुन त्यात कोणत्याही प्रचलित शासननियम अथवा तरतुदींचा भंग होणार नाही याची खातरजमा करुनच पुढील कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग विअतप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला उप विभाग(एक) अनुक्रमांक १० नियम ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील

नियम १४७ (क) खाली टिप-१ अन्वये प्रशासनिक विभागांना प्राप्त झालेल्या प्राधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. उपरोक्त नियमातील अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्याची व सदर करारनामा करताना विहीत कार्यपध्द्तीचे अनुसरन करण्याची जबाबदारी राज्य पोलीस तक्रार प्राधिकरणाची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२४०४१९१२१९३४३२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAHUL VIJAY KULKARNI

Digitally signed by RAHUL VIJAY KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=31493D4A6291F531ED8FD00972CCBFA0376623C7F6C38C3B848BFBE06685A219, cn=RAHUL VIJAY KULKARNI
Date: 2024.04.19 12:34:25 +05'30'

**( राहुल कुलकर्णी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.पोलीस महासंचालक, मुंबई
२.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
३.मा. अध्यक्ष / सदस्य, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण, मुंबई.
४.अपर पोलीस महासंचालक (आस्था.) तथा सदस्य सचिव, राज्य पोलीस तक्रार प्राधिकरण, मुंबई.
५.उप महाप्रबंधक (नियोजन), महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, १६ वा मजला, टेलिफोन हाऊस, वी.एस. मार्ग, दादर (प.), मुंबई-२८.
६.व्यवस्थापक, महानगर टेलिफोन निगम लिमिटेड, कुपरेज एक्सेंज इमारत, महर्षी कर्वे रोड, मुंबई.
७.उप सचिव (का. २२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.निवड नस्ती, पोल १४